**विशेष सहाय्य योजनेतील लाभार्थ्यांना उत्पन्नाचा दाखला सादर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: विसयो-२०२२/प्र.क्र.८७/विसयो**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २२ जून, २०२३.

<u>वाचा</u> :- १) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा शासन निर्णय क्र. विसयो-२०१८/प्र.क्र.६२/विसयो, दि.२०.०८.२०१९.
२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा शासन निर्णय क्र.विसयो-२०२०/प्र.क्र.१००/विसयो, दि.०३.०५.२०२१.

**<u>प्रस्तावना:-</u>**

विभागाच्या दिनांक २०.०८.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये विशेष सहाय्य योजनांतर्गत संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्ती वेतन योजना या योजनेतील लाभार्थ्यांकडून दरवर्षी आर्थिक वर्ष संपल्यानंतर एप्रिल ते जून या कालावधीत उत्पन्नाचा दाखला घेण्याची तरतूद आहे. सदर योजनेतील ५० वर्षावरील लाभार्थ्यांच्या अडी अडचणी विचारात घेऊन उत्पन्नाचा दाखला दरवर्षी न घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्ती वेतन योजना या योजनेतील ५० वर्ष व त्यापुढील वयोगटातील लाभार्थ्यांसाठी उत्पन्नाचा दाखला दरवर्षी न घेता तो ५ वर्षांतून एकदा घेण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०६२२१२४६३०४९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, pseudonym=81399435626E9FEA18299D95CAA243F02DC0029F, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2023.06.22 12:48:48 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२) विभागीय आयुक्त, पुणे/कोकण/नाशिक/नागपूर/अमरावती व औरंगाबाद.
३) सर्व जिल्हाधिकारी,
४) संचालक, लेखा व कोषागरे, नविन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई (२ प्रती)
६) निवासी लेखाधिकरी, मुंबई
७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
८) महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर

९) वित्त विभाग, अर्थसंकल्प-७ अर्थोपाय व व्यय-१४, मंत्रालय, मुंबई
१०) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
११) सहाय्यक संचालक, (वित्त व लेखा), लेखापरिक्षण कक्ष, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) निवड नस्ती, विसयो.